सन २०२१-२२ मध्ये राज्यातील आदिवासी जिल्ह्यामध्ये आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवडीची योजना राबविण्यासाठी रु. १८.०० लाख (रु. अठरा लाख फक्त) निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.
(लेखाशिर्ष- २४०१ A८०६).

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र.आपयो-२०२१/प्र.क्र. १०८/९अे**
हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २८ डिसेंबर, २०२१

**वाचा:-**

१) संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. कृआ / फलो-३/शे.शेम.परसबाग/२१-२२/१८८४३/२०२१, दि. १६/०६/२०२१
२) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. आपयो-२०२१/प्र.क्र. १०८/९अे, दि. ०९/०७/२०२१
३) संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. कृआ / फलो-३/आपयो/२१-२२/३६६७४/२०२१, दि. ०९/११/२०२१
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१
५) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दि. २०/१२/२०२१

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत राज्यातील १४ जिल्हयांतील आदिवासी भागातील कुपोषणाचे प्रमाण कमी करण्याच्या उद्देशाने व आदिवासी बांधवांना पौष्टिक आहार पुरविण्यासाठी, आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत पौष्टीक भाजीपाला व फळांची निवड करुन त्याची लागवड करण्यास प्रोत्साहन देण्यासाठी **"आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवड"** ही योजना राज्यात सन २००३-०४ पासून राबविण्यात येत आहे. सदर योजना राबविण्याकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु. ३०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला पिकांची लागवड या योजनेअंतर्गत आदिवासी कुटुंबामधील कुपोषणाचा प्रश्न सोडविण्याच्या दृष्टिने सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय निधीच्या ६०% निधीच्या मर्यादेत म्हणजेच रु. १८.०० लाख एवढया निधीच्या कार्यक्रमाला उपरोक्त वाचा येथील क्र. २ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरुन सदर योजना सन २०२१-२२ मध्ये राज्यात राबविण्याकरीता रू. ३०.०० लाख निधीचा प्रस्ताव संचालक (फलोत्पादन) यांनी उपरोक्त वाचा येथील क्र. ३ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. उपरोक्त वाचा येथील

क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये आदिवासी विकास विभागाने लेखाशीर्ष (२४०१ A८०६) या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय निधीच्या ६०% निधीच्या मर्यादेत रू. १८.०० लाख फक्त (रू. अठरा लाख फक्त) इतका निधी विभागाच्या अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित केला आहे. सदर निधी कृषि आयुक्तालयास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील ठाणे, पालघर, पुणे, नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगांव, अहमदनगर, नांदेड, यवतमाळ, गडचिरोली, चंद्रपूर, अमरावती व गोंदिया या १४ जिल्हयातील ‘आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवडीची योजना’ सन २०२१-२२ मध्ये राबविण्यासाठी अर्थसंकल्पित निधीच्या ६०% च्या मर्यादेत रुपये १८.०० लाख (रुपये अठरा लाख फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

१. या योजनेसाठी होणारा खर्च सन २०२१-२२ या वर्षाकरीता मंजूर व अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतुन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

"मागणी क्र.टी -५,
२४०१- पीक संवर्धन,
(७९६),जनजाती क्षेत्र उपयोजना
(०१) (३६) आदिवासी कुटूंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवड करणे (कार्यक्रम)
(२४०१ A८०६)
३३ अर्थसहाय्य."

३. आदिवासी कुटुंबामध्ये कुपोषणाचा प्रश्न मोठ्या प्रमाणावर असल्याने विशेष बाब म्हणून उपलब्ध करून दिलेल्या तरतूदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशीर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात विविध योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरून शासनाला आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करून दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजनेतील वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर प्रकरणी इतर कार्यवाही उपरोक्त वाचा येथील क्र. २ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार करावी.

७. प्रस्तुत आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार तसेच, आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीयुडी-२०२१/प्र.क्र. ०७/कार्यासन-६, दिनांक २० डिसेंबर, २०२१ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२८१५५२१२८६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Hemant Gorakhnath Mhapankar
Date: 2021.12.28 15:53:31 +05'30'

**(हे. गो. म्हापणकर)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे खाजगी सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मंत्री, (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा.राज्यमंत्री (फलोत्पादन), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
४) सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय , मुंबई-३२.
५) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय , मुंबई-३२.
६) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
७) आयुक्त (आदिवासी विकास), महाराष्ट्र राज्य, नाशिक.
८) अपर आयुक्त, आदिवासी विकास नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती.
९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे.
१०) संचालक (फलोत्पादन),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
११) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१२) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१३) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१४) महालेखापाल-१-२(लेखा व अनुज्ञेयता) (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१५) अधिदान लेखाधिकारी, मुंबई.
१६) सहायक संचालक (लेखा),आयुक्त (कृषि), यांचे कार्यालय, पुणे.
१७) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
१८) माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय, मुंबई-३२ (प्रसिध्दीसाठी).
१९) कक्ष अधिकारी, कार्यासन क्र. ६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) कक्ष अधिकारी, कार्यासन २अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई . ४०० ०३२.
२१) विविध राष्ट्रीय मंडळावरील महाराष्ट्राचे सदस्य म्हणून कार्यरत असलेल्या जिल्ह्यातील व्यक्ती, राज्यातील फळे/फुले उत्पादक संघाचे प्रतिनिधी,
२२) निवडनस्ती, कार्यासन ९-अे.